महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन आदेश क्रमांक : मविसे १०१५/प्र.क्र.१०१ (भाग-१)/२०१५/आस्था-३,**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १० सप्टेंबर, २०१५.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व (५) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या विनंतीनुसार, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | **शेरा** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | **(४)** |
| १. | श्री.एस.एस. निंबाळकर, गट विकास अधिकारी, पंचायत समिती कामठी, जि.नागपूर | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, नागपूर. | रिक्त पदी |
| २. | श्री.व्ही.आर. पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जि.वर्धा | गट विकास अधिकारी, पंचायत समिती उमरी, जि.नांदेड | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | **शेरा** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | **(४)** |
| ३. | श्रीमती एस.एम. खिल्लारे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जि.पालघर | (पदनिर्मिती पश्चात) दि.२७.८.२०१५ च्या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण आदेशात अंशत: बदल करुन. |
| ४. | श्री.डी.एन.तेटगुरे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती माणगांव, जि.रायगड | गट विकास अधिकारी, पंचायत समिती पनवेल, जि.रायगड | श्री.आर.एम. पाटील यांच्या प्रस्तावित बदलीने / प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदी |
| ५. | श्री.एस.ए. मारकड, गट विकास अधिकारी, पंचायत समिती नांदूरा, जि.बुलडाण | गट विकास अधिकारी, पंचायत समिती बारामती, जि.पुणे | श्रीमती आर.ए. भागवत परिविक्षाधीन अधिकारी यांच्या प्रशिक्षणानंतर (दि.१२.२.२०१६ नंतर) रिक्त होणाऱ्या पदी. |
| ६. | श्री.एस.एन. गोपाळ, गट विकास अधिकारी, पंचायत समिती परभणी, जि.परभणी | गट विकास अधिकारी, पंचायत समिती अर्धापूर, जि.नांदेड | श्रीमती ए.एस. ठाकूर, परिविक्षाधीन अधिकारी यांच्या प्रशिक्षणानंतर (दि.१२.२.२०१६ नंतर) रिक्त होणाऱ्या पदी. |

२. श्रीमती एस.एम. खिल्लारे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड यांची पदस्थापना उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जि.पालघर येथे पदनिर्मिती पश्चात करण्यात येत आहे. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता), जि.पालघर हे पद निर्माण होईपर्यंत श्रीमती खिल्लारे या गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड या पदावरच कार्यरत राहतील. दिनांक २७.८.२०१५ च्या आदेशान्वये गट विकास अधिकारी, पंचायत समिती, महाड, जि.रायगड या पदावर प्रशिक्षणाकरिता नियुक्ती दिलेल्या श्रीमती एम.जे. रावतळे यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

३. श्री.डी.एन. तेटगुरे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती माणगांव, जि.रायगड यांची बदलीने पदस्थापना श्री.आर.एम. पाटील, गट विकास अधिकारी, पंचायत समिती पनवेल, जि.रायगड यांच्या प्रस्तावित बदलीने / प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदावर करण्यात येत आहे. तथापि, श्री.आर.एम. पाटील यांची अन्यत्र पदस्थापना होईपर्यंत श्री.तेटगुरे हे गट विकास अधिकारी, पंचायत समिती माणगांव, जि.रायगड या पदावरच कार्यरत राहतील.

४. श्री.एस.ए. मारकड, गट विकास अधिकारी, पंचायत समिती नांदूरा, जि.बुलडाणा यांची गट विकास अधिकारी, पंचायत समिती बारामती, जि.पुणे या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे. तथापि, श्रीमती आर.ए. भागवत, परिविक्षाधीन अधिकारी यांचे प्रशिक्षण संपेपर्यंत (१२.२.२०१६ पर्यंत) श्री.मारकड हे गट विकास अधिकारी, पंचायत समिती नांदूरा, जि.बुलडाणा या पदावरच कार्यरत राहतील.

५. श्री.एस.एन. गोपाळ, गट विकास अधिकारी, पंचायत समिती परभणी, जि.परभणी यांची गट विकास अधिकारी, पंचायत समिती अर्धापूर, जि.नांदेड या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे. तथापि, श्रीमती ए.एस. ठाकूर, परिविक्षाधीन अधिकारी यांचे प्रशिक्षण संपेपर्यंत (१२.२.२०१६ पर्यंत) श्री.गोपाळ हे गट विकास अधिकारी, पंचायत समिती परभणी, जि.परभणी या पदावरच कार्यरत राहतील.

६. श्री.एस.एस. निंबाळकर आणि श्री.व्ही.आर. पाटील यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी श्री.एस.एस. निंबाळकर आणि श्री.व्ही.आर. पाटील यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

८. श्री.एस.एस. निंबाळकर आणि श्री.व्ही.आर. पाटील यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१०१२४९३७४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.09.10 18:17:41 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
५) विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर, रायगड, पुणे, परभणी, नांदेड, बुलडाणा, वर्धा, नागपूर.
७) महालेखापाल- १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, रायगड, पुणे, परभणी, नांदेड, बुलडाणा, वर्धा, नागपूर.
९) संबंधित अधिकारी (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत.)
१०) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
११) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.